संगणक संकेतांक क्र. 201012221844290001

**दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडॉर प्रकल्पांतर्गत कामाचे नियोजन व अंमलबजावणीसंबंधी संनियंत्रणासाठी उच्चाधिकार समितीचे गठन**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : डिएमआयसी २०१०/प्र.क्र. ५३०/उद्योग-२**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : २ जून, २०१०.**

**प्रस्तावना :-**

मालाच्या जलद वाहतुकीसाठी केंद्र शासनाच्या रेल मंत्रालयामार्फत स्वतंत्र रेल्वे मार्ग (डेडिकेटेड फ्रेट कॉरीडोर) उभारण्यात येणार आहे. सदर रेल्वे मार्गाच्या इन्फ्ल्युअन्स झोनमधील क्षेत्राचा आर्थिक व औद्योगिकदृष्टया विकास करुन, तिथे गुंतवणूक व औद्योगिक क्षेत्रे विकसित करण्यासाठी दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर (डी.एम.आय.सी.) हा प्रकल्प केंद्रीय वाणिज्य व उद्योग मंत्रालयामार्फत हाती घेण्यात आला आहे. सदर प्रकल्प महाराष्ट्रासह ६ राज्यांमध्ये भारत सरकारमार्फत जपान सरकार तसेच संबंधित राज्यांच्या सहकार्याने उभारण्यात येत असून, त्याकरिता केंद्र शासनाने दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर डेव्हलपमेंट कार्पोरेशन या महामंडळाची स्थापना केलेली आहे. नियोजित प्रकल्पासाठी काही आंतरराष्ट्रीय सल्लागारांकडून सदर महामंडळामार्फत बृहत-आराखडा व प्रकल्पनिहाय अहवाल तयार करण्यात येत आहे. डी.एम.आय.सी. प्रकल्पाच्या संदर्भात राज्यस्तरावर महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांची "नोडल एजन्सी" म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे.

२. डी.एम.आय.सी. प्रकल्पाच्या आखणीमध्ये बरीचशी प्रगती झालेली असून, त्याचा आढावा तसेच, डी.एम.आय.सी. क्षेत्रामध्ये सुरुवातीला हाती घ्यावयाच्या (अर्ली बर्ड) प्रकल्पाच्या प्रस्तावाचे सादरीकरण दिनांक १३/५/२०१० रोजी मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर डेव्हलपमेंट कार्पोरेशनचे प्रमुख तसेच त्यांनी नियुक्त केलेल्या आंतरराष्ट्रीय सल्लागार यांचेमार्फत करण्यात अ ाले. बैठकीत शेंद्रे बिडकीन (जिल्हा औरंगाबाद), सिन्नर (जिल्हा नाशिक), दिघी (जि.रायगड) बंदराच्या परिसरात व धुळे येथे मेगा औद्योगिक क्षेत्रे, अतिरिक्त शेंद्रे औद्योगिक क्षेत्र येथे आंतरराष्ट्रीय दर्जाचे प्रदर्शन व कन्व्हेन्शन केंद्र तसेच कारला (जि.पुणे) येथे मल्टी नोडल लॉजिस्टीक पार्क या ६ अर्ली बर्ड प्रकल्पांना तत्वतः मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

डी.एम.आय.सी. प्रकल्पांतर्गत अर्ली बर्ड प्रकल्प तसेच यापुढे घ्यावयाच्या प्रकल्पाच्या व अनुषंगिक कामाचे कालबध्द नियोजन व अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घेणे, सर्व संबंधित विभागांमध्ये समन्वय घडवून आणणे तसेच या प्रकल्पांशी संबंधित बाबींवर निर्णय घेणे यासाठी मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली पुढीलप्रमाणे उच्चाधिकार समिती गठीत करण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १ | मा.मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २ | अप्पर मुख्य सचिव (महसुल) | सदस्य |
| ३ | अप्पर मुख्य सचिव (वने) | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव (उद्योग) | सदस्य |

कृ.मा.प.

| | | |
|---|---|---|
| ५ | प्रधान सचिव (नगर विकास-१ ) | सदस्य |
| ६ | सचिव (परिवहन) | सदस्य |
| ७ | सचिव (सार्वजनिक बांधकाम) | सदस्य |
| ८ | सचिव (जलसंपदा) | सदस्य |
| ९ | महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई | सदस्य |
| १० | व्यवस्थापकीय संचालक, सिडको | सदस्य |
| ११ | जिल्हाधिकारी, रायगड / ठाणे / नाशिक / धुळे / औरंगाबाद/अहमदनगर | सदस्य |
| १२ | महाव्यवथापक, मध्य रेल्वे / पश्चिम रेल्वे / कोंकण रेल्वे | सदस्य |
| १३ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरिटाईम बोर्ड | सदस्य |
| १४ | मुख्य कार्यकारी अधिकारी तथा व्यवथापकीय संचालक दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर डेव्हलपमेंट कार्पोरेशन | सदस्य |
| १५ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य सचिव व निमंत्रक |

२. डी.एम.आय.सी. प्रकल्पाचे राज्यातील नोडल एजन्सी ही महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ असून, महामंडळाच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली देखील समिती गठीत करणे आवश्यक आहे की, जेणेकरुन सर्व संबंधित विभागाच्या क्षेत्रीय यंत्रणेशी समन्वय साधणे, प्रकल्पनिहाय आढावा घेणे, तसेच निवडलेल्या प्रकल्पांना चालना देणे सुलभ होईल. सदर समितीचे गठन करण्यास मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ यांना प्राधिकृत करण्याचे प्रस्तावित आहे.

३. सदर शासन निर्णय शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१००६०२२१०६२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(कांचन विजयन)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
१)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई .
२)मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई .
३)मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई .
४) मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव , मंत्रालय, मुंबई .
५)मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई .
६)अप्पर मुख्य सचिव (महसुल), मंत्रालय, मुंबई .
७)अप्पर मुख्य सचिव (वने), मंत्रालय, मुंबई .
८)प्रधान सचिव (उद्योग), मंत्रालय, मुंबई .
९)प्रधान सचिव (नगर विकास- १), मंत्रालय, मुंबई .
१०)सचिव, औद्योगिक धोरण आणि प्रचालन, वाणिज्य व उद्योग मंत्रालय, भारत सरकार, उद्योग भवन, नवी दिल्ली.

११)सचिव (परिवहन-गृह), मंत्रालय, मुंबई .
१२)सचिव (सार्वजनिक बांधकाम), मंत्रालय, मुंबई .
१३)सचिव (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई,, मंत्रालय, मुंबई .
१४)महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, मुंबई.
१५)व्यवस्थापकीय संचालक, सिडको, मुंबई.
१६)मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरिटाईम बोर्ड, , मुंबई.
१७)जिल्हाधिकारी, रायगड / ठाणे / नाशिक / धुळे / औरंगाबाद/अहमदनगर.
१८)महाव्यवथापक, मध्य रेल्वे / पश्चिम रेल्वे /कोंकण रेल्वे , मुंबई.
१९)मुख्य कार्यकारी अधिकारी, दिल्ली-मुंबई इंडस्ट्रियल कॉरिडोर डेव्हलपमेंट कार्पोरेशन, दिल्ली.
२०)मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ,मुंबई.
२१)सर्व मंत्रालयीन विभाग.
२२)निवडनस्ती - उद्योग २

--------